आम आदमी विमा योजना सन २०१४-१५ विमा हप्त्याची रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळाला अदा करणे.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र. ५६३ /विसयो-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: २१ ऑगस्ट, २०१४

**वाचा :**

१. **शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: आआवि-२००७/ प्र.क्र.३५६/ विसयो, दिनांक १६ ऑक्टोंबर,२००७**
२. **भारतीय आयुर्विमा महामंडळाचे दिनांक २८ एप्रिल, २०१४ चे पत्र.**
३. **भारतीय आयुर्विमा महामंडळाचे दिनांक १६ जुलै, २०१४ चे पत्र.**
४. **शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र. ५६३ /विसयो-१, दिनांक २२ मे, २०१४.**

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत आम आदमी विमा योजना राज्यात संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत ग्रामीण भागातील भूमिहीन कुटुंबातील १८-५९ वयोगटातील कमावत्या व्यक्तीला लाभ देण्यात येतो. त्यांचा विमा भारतीय महामंडळामार्फत काढण्यात येतो. वार्षिक विम्या हप्त्याची प्रति सदस्य रक्कम रु.२००/- इतकी असून रु.१००/- केंद्र शासनामार्फत व रु.१००/- राज्य शासनामार्फत भारतीय आयुर्विमा महामंडळास दिली जाते. सन २०१४-१५ करिता नवीन लाभार्थ्यांच्या वार्षिक विमा हप्त्यापोटी रक्कम भरणा करण्याबाबत भारतीय आयुर्विमा महामंडळाने संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये कळविले आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात आम आदमी विमा योजनेकरिता

रु.४२,४५,९७,०००/- एवढी अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. त्यापैकी संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये आयुर्विमा महामंडळास रु. ४.०० कोटी वितरीत करण्यात आले आहेत. आता, आयुर्विमा महामंडळास नवीन लाभार्थ्यांच्या हप्त्यापोटी रु.४,००,००,०००/- (रु. चार कोटी फक्त) रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:

वरील बाब विचारात घेऊन आम आदमी विमा योजनेंतर्गत नवीन लाभार्थ्यांच्या, सन २०१४-१५ साठीच्या वार्षिक हप्त्यासाठी रु. ४,००,००,०००/- (रु. चार कोटी फक्त) इतकी रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळास अदा करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. सदर प्रमाणे वार्षिक विमा हप्त्याची रक्कम अदा करण्यासाठी रु. ४,००,००,०००/- (रु. चार कोटी फक्त) इतका निधी अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना याद्वारे वितरीत करण्यात येत आहे. या खर्चासाठी अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आणि श्री.ग.कि. वाघ, उप सचिव यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांनी उपरोक्त प्रयोजनासाठी "LIFE INSURANCE CORPORATION OF INDIA, MUMBAI" या नावाने रु.४,००,००,०००/- (रु. चार कोटी फक्त) इतक्या रकमेचा धनादेश तात्काळ काढावा.

४. उपरोक्त खर्च " मागणी क्रमांक एन-३, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ११०- इतर विमा योजना (००)(०१) आम आदमी योजना, ५०- इतर खर्च (२२३५ ३३८२)" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मधील मंजूर तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२११६२१४८१२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Kisanrao Wagh

Digitally signed by Gajanan Kisanrao Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Gajanan Kisanrao Wagh
Date: 2014.08.21 16:18:41 +05'30'

**(ग.कि.वाघ)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. अवर सचिव तथा आहरण व सवितरण अधिकारी, सा.न्या.व वि.स.वि.,मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकहय भवन,५ वा मजला, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
४. महालेखापाल, महाराष्ट्र१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
५. अवर सचिव, व्यय-१४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. कक्ष अधिकारी (कार्या विसयो-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. निवड नस्ती (विसयो-१)